**उप अधीक्षक, भूमि अभिलेख, लोहारा, जि. उस्मानाबाद कार्यालयाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बीएलडी - २०१५/प्र.क्र.२१९/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०१९.

**संदर्भ**:- १) उपसंचालक, भूमि अभिलेख (संलग्न), जमाबंदी आयुक्त (सर्वसाधारण), पुणे यांचे पत्र क्र.लेखा-१/प्र.क्र.३०३/२०१५, दि.०४/०९/२०१५.
२) जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख, उस्मानाबाद यांचे पत्र क्रमांक/आस्था /इमारत बांधकाम/प्रस्ताव/२०१४, दि.१८/११/२०१४.

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन क्र. १ येथील पत्रान्वये उस्मानाबाद जिल्ह्यातील उप अधीक्षक, भूमि अभिलेख, लोहारा या कार्यालयीन इमारत बांधकाम करण्यासाठीच्या रु.९४.२१ लाख खर्चाच्या बांधकामाला प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे.

२. सदर इमारत बांधकामाचे उपविभागीय अभियंता, सा. बां. उपविभाग, लोहारा यांनी सन २०१५ -१६ च्या जिल्हा दर सुचीवर आधारित रु.९४.२१ लाख किंमतीचे अंदाजपत्रक तयार केले असून सदर अंदाजपत्रक उपसंचालक, भूमि अभिलेख (संलग्न), जमाबंदी आयुक्त (सर्वसाधारण), पुणे यांनी दि. ०४/०९/२०१५ च्या पत्रान्वये शासनास सादर केले आहे.

**शासन निर्णय:-**

उस्मानाबाद जिल्ह्यातील उप अधीक्षक, भूमि अभिलेख, लोहारा या कार्यालयीन इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकांची सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी तपासणी केल्यानंतर सदर बांधकामाच्या सहपत्र “अ” मध्ये दर्शविल्याप्रमाणे रु.९८.७८ लक्ष (रुपये अठ्ठ्याण्णव लाख अठ्ठ्याहत्तर हजार फक्त) च्या खर्चास खालील अटींच्या अधीन राहून शासन प्रशासकीय मान्यता प्रदान करीत आहे:-

**अटी व शर्ती-**

अ) अंदाजपत्रकात मुख्य इमारतीसह फर्निचर, अग्निरोधक यंत्रणा यासाठी ढोबळमानाने तरतुदी केल्या आहेत. याबाबत उपभोक्ता विभागाची सहमती गृहीत धरुन केलेल्या तरतुदी

तशाच ठेव्ण्यात येत आहेत. ढोबळमानाने केलेल्या तरतूदीच्या बाबींचे सविस्तर दरपत्रके तयार करुन त्यास सक्षम अधिका-यांची मंजूरी घेण्यात यावी.

ब) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क. १, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर मान्यता शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-विअप्र-२०१३/प्र.क्र.-३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५ मधील भाग- पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ नियम क्र.१३४ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

३. सदर इमारत बांधकामासाठी येणारा खर्च लेखाशिर्ष “मागणी क्रमांक एच-८, ४०५९ - सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१ कार्यालयीन इमारती ०५१, बांधकाम (२३) भूमि अभिलेख कार्यालये- इमारत बांधकाम (२३)(०१) मोठी बांधकामे ५३ (४०५९ २४६१) (२३) (०२) आस्थापना खर्च) ६३, आंतरलेखा हस्तांतरणे (४०५९ २४७९) (२३) (०३) हत्यारे व संयंत्रे यांचा खर्च हत्यारे व संयंत्र यांचा खर्च (४०५९ २४८८) ६३, आंतरलेखा हस्तांतरणे” या उद्दिष्टाखाली उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर कामाची सुरुवात सन २०१८-१९ या आर्थिक वर्षापासून सुरु होत आहे. उक्त लेखाशिर्षाखाली प्रस्तावित बांधकामाचे वर्षनिहाय खर्चाचे नियोजन पुढीलप्रमाणे राहील.-

| आर्थिक वर्ष | या आदेशांतील बांधकामाचा अपेक्षित खर्च (रु. कोटी) | उक्त लेखाशिर्षाखाली सुरु असलेल्या इतर कामांसाठी आवश्यक तरतूद (रु. कोटी) | एकूण मंजूर तरतूद (रु. कोटी) |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| २०१८ - १९ | ---- | ---- | ---- |
| २०१९ - २० | ०.३२९२ | १.०१५६ | २.०० |
| २०२० - २१ | ०.३२९२ | १.२१३४ | २.०० |
| २०२१ - २२ | ०.३२९४ | ०.५६५५ | २.०० |

५. उक्त लेखाशिर्षाखाली सुरु असलेल्या कामाच्या वित्तीय नियोजनाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.-

(रु. हजारात)

| अ. क्र. | कामाचे नाव | एकूण अपेक्षित खर्च (रु.) | मागील वर्षाअखेर झालेला खर्च (रु.) | चालू वर्षात अपेक्षित खर्च (रु.) | पुढील वर्षासाठी Carry Forward करावयाची तरतूद (रु.) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | | |
| | | | | | अ | ब | क |
| | महसूल विभागातील २६ भूमि अभिलेख कार्यालयीन इमारतींची बांधकामे | १९७२९० | १८४६८१ | ११९२३ | ३२९२ | ३२९२ | ३२९४ |

६. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६/२०१७/इमा-३, दि. २८/०७/२०१७ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२१११५४७३८५०१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Nilkanth Pandurang Awhad

Digitally signed by Nilkanth Pandurang Awhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e42a88b7548c3a7d48b7a77d85de3524cf8f2e7e0f87091223ad803d4d4a2a31, cn=Nilkanth Pandurang Awhad
Date: 2019.02.11 15:49:45 +05'30'

**( नि.पां.आव्हाड )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर.
३) उप अधीक्षक, भूमि अभिलेख, लोहारा, जि. उस्मानाबाद.
४) उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लोहारा, जि. उस्मानाबाद.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा - उस्मानाबाद.
६) उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई - ३२.
७) कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, -३२
८) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

(शासन निर्णय क्र. बीएलडी-२०१५/प्र.क्र.२१९/ई-८, दि. ११ फेब्रुवारी, २०१९ चे सहपत्र)

"सहपत्र-अ"

Name of Work: Construction of Deputy Superitendent, Land Record Office On Extg. Tahsil building (2nd Floor) at Lohara, Dist. Osmanabad.

**RECAPITULATION SHEET**

| Sr. No. | Essential items | Amount Rs. |
|---|---|---|
| 1) | Building proper<br>Area of Building Area in sq.m. rate<br>Second floor 292.65 x Rs.22000.00<br>Total Cost of Construction | <br><br>64,38,300.00<br><br>**64,38,300.00** |
| 2) | Electrification Internal @5 % | 3,21,915.00 |
| 3) | Furniture Minimum<br>Carpet Area X Rs 5000/Sq. M.<br>161.23 X 5000.00 | <br><br>8,06,150.00 |
| 4) | fire fighting Arrangements @ 5.00% | 3,21,915.00 |
| | Total (A) | **78,88,280.00** |
| 5) | Add for Contingencies charges @4 % | 3,15,531.00 |
| | Total (B) | **82,03,811.00** |
| 6) | Rate of essential items RS/Sq.M | 28,033.00 |
| 7) | Add for Probable Increase in D.S.R.@ 10% | 64,38,300.00 |
| 8) | Add for Price Escalation @ 10% | 64,38,300.00 |
| 9) | Total Cost of Project Total (C) | 12,87,660.00 |
| | Total (B+C) | **94,91,471.00** |
| 10) | Add 15% service charges on 40 % original cost of works | 3,86,298.00 |
| | Total | **98,77,769.00** |
| | | |
| | Say Rs | **98.78 lakhs** |
| | | |